विषय :- केंद्र शासनाने अंतर्गत जलवाहतूकी
करीता मंजूर केलेल्या कामांसाठी
आकस्मिकता निधी मंजूर करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
### गृह विभाग

शासन निर्णय क्र.आयडब्ल्यूटी ०५०४/ सीआर-६६/ बंदरे-१
मंत्रालय, मुंबई- ४०००३२, दिनांक : ३१ मार्च, २००५.

**निर्णय :-** केंद्र शासनाने राज्यातील खालील ५ अंतर्गत जलवाहतुकीच्या योजना मान्य केलेल्या असून त्यासाठी एकूण खर्चाच्या ९० % केंद्रीय अनुदान उपलब्ध करुन देण्याचे मान्य केले आहे. या योजनांचा तपशिल खालीलप्रमाणे आहे :-

**(रुपये हजारात)**

| अ.क्र. | योजनेचे नाव व मंजुरी आदेश क्रमांक | प्रकल्पाची रक्कम | ९०% केंद्र सहाय्य रक्कम | १०% राज्य सहाय्यक रक्कम | केंद्र शासनाने मंजूर केलेल्या पहिल्या हप्त्याची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | विष्णुपुरी, नांदेड येथील गोदावरी नदीत अंतर्गत जल वाहतूक विकास प्रकल्प | २७२२१ | २४४९८९ | २७२२ | ४८९९ |
| २ | दक्षिण मुंबई अंबा नदी ते धरमतर खाडी मांडवा येथे परतीचे अंतर्गत जलमार्ग विकास प्रकल्प | ४१०९५ | ३६९८५५ | ४११० | ८२०० |
| ३ | दक्षिण मुंबई अंबा नदी ते धरमतर खाडी करंजा येथे परतीचे अंतर्गत जलमार्ग विकास प्रकल्प | ४८१५४ | ४३३३८६ | ४८१५ | ९६०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ४ | म्हसळा ते मांदाड नदी, राजपूरी खाडी येथे परलीचे अंतर्गत जलमार्ग विकास प्रकल्प | ४६९४५ | ४२२५०५ | ४६९५ | १३०० |
| ५ | म्हसळा ते मांदाड नदी, (राजपूरी खाडी) जंजिरा किल्ला येथील परलीचे अंतर्गत जलमार्ग विकास प्रकल्प | १२४६० | ११२१४० | १२४६ | १६२० |
| | | ९१०५८१०५ | ९५८२८१७ | ९१०५८८ | ३३६९९ |

२. या योजनांसाठी राज्य शासनाचा खर्च म्हणून १० % अनुदान अर्थसंकल्पात उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. केंद्र शासनाने रु.३.३६९१ कोटी एवढा केंद्रीय अनुदानाचा पहिला हप्ता मंजूर केलेला आहे. या अनुदानातून सन २००४-२००५ करिता रु.८९.८१ लाख एवढा केंद्र शासनाचा निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. यावर राज्य शासनाचा १० % म्हणजे ९.९७ लाख एवढा निधी खर्च करावा लागेल. म्हणून सन २००४-२००५ या वर्षात रु.९.९७ लाख एवढा निधी मंजूर अनुदानातून मान्य करण्यात येत असून सदरची रक्कम मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरी टाईम बोर्ड यांच्याकडे सुपूर्द करण्यात मंजूरी देण्यात येत आहे. हा खर्च मागणी क्र.बी-३ - ३०५६ अंतर्देशीय जल परिवहन १९० सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांना साहाय्यक अनुदान (०१) मेरी टाईम बोर्डास साहाय्यक अनुदान (०१) (०२) महाराष्ट्र मेरी टाईम बोर्डास साहाय्यक अनुदान (खाडी बंदरे विकास) (योजनांतर्गत) (३०५६ ०० ५५) या लेखाशिर्षाखाली अंतिमतः खर्ची टाकण्यात यावा.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरी टाईम बोर्ड,मुंबई यांना रक्कम काढून खर्च करण्यास प्राधिकृत करण्यात येत असून सदर रक्कम मुक्त करण्यास शासन या द्वारे मान्यता देत आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरी टाईम बोर्ड,मुंबई यांनी वरील मंजूरी प्रमाणे रक्कम खर्च करताना ज्या कारणांसाठी तरतूद उपलब्ध करुन दिलेली आहे. त्याच कारणासाठी पूर्णपणे खर्च करावी. सदरहू खर्च केल्याची माहिती शासनास तात्काळ अवगत करावी.

ही रक्कम सुधारीत अंदाजा व्यतिरिक्त मंजूर करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. सीआर २५९/०५/व्यय ८, दिनांक ३०.३.२००५ व क्र. १६७/अर्थोपाय, दिनांक ३१.३.२००५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सी. जी. चौधरी )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रती-

मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
संचालक (लेखा व कोषागारे), मुंबई.
मुख्य बंदर अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
सागरी अभियंता, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२, (कार्यासन-१४५४ )
कक्ष अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती.